**मौजे. मंगळूर ता. तुळजापूर जि. उस्मानाबाद या पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पापुयो-२००८/प्र.क्र.१६२/पापु-१८.**
नवीन प्रशासन भवन
मंत्रालय, मंबई ४०० ०३२
दिनांक: ०६ डिसेंबर, २०१४.

**वाचा :-**

१) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ग्रापापु-१००५/प्र.क्र.८५/पापु-०७ दिनांक ९ मे,२००५..
२) शासन निर्णय क्र. ग्रापापु-१००७/प्र.क्र.२४३/पापु-०७/ दिनांक ४ फेब्रुवारी,२००९
३) शासन निर्णय क्र.ववेका-२००२/प्र.क्र.१३२/पापु-१०,दि.१२.७.२००२.

**प्रस्तावना :-**

मौजे. मंगळूर ता.तुळजापूर जि.उस्मानाबाद या पाणी पुरवठा योजनेच्या कामास केंद्र पुरस्कृत वर्धित वेग कार्यक्रमा अंतर्गत रु. ९३.७९ लक्ष रक्कमेच्या ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास वर नमूद शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि काही अपरिहार्य कारणामुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली. सदर वाढ ही मुळ अंदाजपत्रकीय किंमतीच्या १५% पेक्षा जास्त असल्यामुळे मुख्य कार्यकारी अधिकारी जि.प.उस्मानाबाद यांनी सदर प्रस्ताव या विभागाकडे सादर केला होता. त्याप्रमाणे मौजे. मंगळूर ता.तुळजापूर जि.उस्मानाबाद या पाणी पुरवठा योजनेला सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

उपरोक्त प्रस्तावाच्या अनुषंगाने मौजे. मंगळूर ता.तुळजापूर जि.उस्मानाबाद या पाणी पुरवठा योजनेच्या रु. ११७.२५ लक्ष ( रु. एक कोटी सतरा लाख पंचवीस हजार फक्त )किंमतीच्या सुधारीत अंदाजपत्रकास व आराखडयास या शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

२) ही योजना मौ.मंगळूर गावाची असल्याने ती सर्व कामे ६ महिन्यात पुर्ण करुन सबंधित ग्रामपंचायतीस हस्तांतरीत करण्यात यावी, तसेच ही योजना पुनर्सुधारीत करण्यात येणार नाही.

३) योजनेचे लेखे बंद करुन ही योजना राबविणे, त्यांचे परिरक्षण, दुरुस्त्या ( विशेष दुरुस्त्या धरुन ) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवीकरण निधीसाठी किंवा योजनेच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणताही आर्थिक सहाय्य मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम १९६० मधील तरतुदीनुसार आकारता येणा-या पाणी पट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल असे

बघण्याची जबाबदारी सबंधीत ग्रामपंचायतीची/जिल्हापरिषदेची राहील. त्यानुसार या योजनेसाठी पाणीपट्टीचा दर आकारण्यात यावा. याप्रमाणे दर आकारणी करुनही योजना आर्थिकदृष्टया स्वयंपूर्ण झाली नाही, तर देखभाल /दुरुस्तीचा जादा खर्च ग्रामपंचायतीस/ जिल्हापरिषदेस त्यांच्या इतर उत्पन्नातून भागवावा लागेल. तसेच सदर योजनेच्या कामाचा पुर्णत्वाचा दाखला त्वरीत सादर करण्यात यावा.

४) या योजनेचा खर्च जिल्हापरिषदेला राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत प्राप्त झालेल्या निधीतून भागविण्यात यावा.

५) हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौ-संदर्भ क्र.२९१५/दिनांक १०.०९.२००८ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१९/व्यय-३, दिनांक १०.०७.२०१४. अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर वर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१४१२०६१५५४१२५१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHADGE RAMDAS M

Digitally signed by GHADGE RAMDAS M
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation, postalCode=400001, st=Maharashtra, cn=GHADGE RAMDAS M
Date: 2014.12.06 16:01:38 +05'30'

( रा. म. घाडगे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
३) जिल्हाधिकारी, उस्मानाबाद.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. उस्मानाबाद
५) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
६) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ना.व.ग्रा.मंडळ, उस्मानाबाद
७) कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकाण, ना.व.ग्रा.योजना मंडळ, उस्मानाबाद.
८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हापरिषद, उस्मानाबाद.
९) संचालक भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे-४११ ०३७.
१०) उप संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, औरंगाबाद विभाग उस्मानाबाद.
११) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) महालेखाकार, ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
१४) निवडनस्ती पापु-१८.